महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २२१०जी८६१)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र. ०१ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २९ जून, २०२०

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.मफुयो-२०२०/प्र.क्र.७८/आरोग्य-६

**शासन निर्णय :-**

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२० (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रक्कमांसह) यांस विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली आहे आणि ते सन २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४ दि.१८.३.२०२० मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.१६.४.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि Covid-१९ च्या पार्श्वभूमीवर महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतील लाभार्थ्यांचे विमा संरक्षण अबाधित ठेवणे आवश्यक असल्याने वित्त विभागामार्फत या योजनेकरिता सद्यस्थितीत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर एकूण अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ३५ टक्के निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता २२१०जी८६१ या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता रु.१००००.०० लाख इतका निधी अर्थसंकलपीत आहे. सदर निधीपैकी रु.३२,८२,५८,६५३/- (अक्षरी रुपये बत्तीस कोटी ब्याऐंशी लाख अठ्ठावन्न हजार सहाशे त्रेपन्न फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डॉऊनमुळ पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलबध करुन दिलेलया तरतूदीतून झालेलया खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेलया अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१९४/व्यय-१३, दि.२५.६.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०२१५३९३८५९२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.07.15 13:13:59 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.